सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात खरेदी करण्यात आलेल्या कापड चोपडची (लिनन) ची प्रलंबित देयके भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०२१७, २१-पुरवठा व सामग्री या उद्दीष्टाखाली शिल्लक असलेले रु.४७,६८,०००/- इतके अनुदान लेखाशिर्ष २२१००२१७, ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्टाखाली पुनर्वितरणाव्दारे महाराष्ट्र वैद्यकिय वस्तू खरेदी प्राधिकरण,मुंबई यांना उपलब्ध करुन देण्याच्या संदर्भात पुरकपत्र निर्गमित करण्याबाबत

महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन पुरकपत्र क्रमांकः निधीवि-४८२४/प्र.क्र ११९/आरोग्य-८

१० वा मजला, गोकुळादास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.

दिनांक : २८ मार्च, २०२५

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.७९/अर्थ-३, दिनांक २९.०७.२०२४

२) शासन निर्णय क्र, वित्त विभाग, क्र.मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम,दिनांक १२.०१.२०२३

३) अतिरीक्त संचालक, आरोग्य सेवा (मानसिक आरोग्य), मुंबई,यांचे पत्र क्र.आआसे/माआ/टे-४/लिनन/अनु.वि/२१९६-२२००/२४, दि.२८.०७.२०२४

४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.निधीवि-४८२४/प्र.क्र.११९/आरोग्य-८,दि.१२.०९.२०२४

५) अतिरीक्त संचालक, आरोग्य सेवा (आरोग्य संस्थांमार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम), मुंबई,यांचे पत्र क्र.आआसे/माआ/टे-४/लिनन/शुध्दीपत्रक/४५१४-१७/२५,दि.२६.०३.२०२५

प्रस्तावना:-

वाचा मधील अ.क्र. ३ येथील अतिरीक्त संचालक, आरोग्य सेवा (मानसिक आरोग्य), मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार तसेच वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार, वाचा मधील अ.क्र. ४ येथील दि.१२.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात खरेदी करण्यात आलेल्या कापड चोपडची (लिनन) ची प्रलंबित देयके भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०२१७ , २१-पुरवठा व सामग्री या उद्दीष्टाखाली शिल्लक असलेले रु.४७,६८,०००/- इतके अनुदान लेखाशिर्ष २२१००२१७, ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्टाखाली महाराष्ट्र वैद्यकिय वस्तु खरेदी प्राधिकरण,मुंबई यांना पुनर्वितरणाव्दारे उपलब्ध करुन खर्च करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. आता सदर शासन निर्णयामध्ये वाचा मधील अ.क्र.५ येथील अतिरीक्त संचालक, आरोग्य सेवा (आरोग्य संस्थांमार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम), मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार नमूद बाबी समाविष्ट करण्याच्या अनुषंगाने शासन पुरकपत्र निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन पुरकपत्र:-**

वाचा मधील अ.क्र. ३ येथील अतिरीक्त संचालक, आरोग्य सेवा (मानसिक आरोग्य), मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार तसेच वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात खरेदी करण्यात आलेल्या कापड चोपडची (लिनन) ची प्रलंबित देयके भागविण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०२१७ , २१-पुरवठा व सामग्री या उद्दीष्टाखाली शिल्लक असलेले रु.४७,६८,०००/- इतके अनुदान लेखाशिर्ष २२१००२१७, ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्टाखाली महाराष्ट्र वैद्यकिय वस्तु खरेदी प्राधिकरण,मुंबई यांना पुनर्वितरणाव्दारे उपलब्ध करुन खर्च करण्यास वाचा मधील अ.क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

२. आता वाचा मधील अ.क्र. ५ येथील अतिरीक्त संचालक, आरोग्य सेवा (आरोग्य संस्थांमार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम), मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार वाचा मधील अ.क्र. ४ येथील दि.१२.०९.२०२४ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.९ नंतर परिच्छेद क्र.९ अ तसेच परिच्छेद क्र.१० नंतर परिच्छेद क्र.१० अ खालीलप्रमाणे समाविष्ट करण्यात येत आहे.:-

**परिच्छेद क्र.९ अ :-**

वित्त विभागाच्या दिनांक २५ जुलै २०२४ च्या शासन परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र ९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख/अतिरीक्त संचालक, (आरोग्य संस्थेमार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम),आरोग्य सेवा आयुक्तालय ,मुंबई यांनी प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२५ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

**परिच्छेद क्र.१० अ :-**

सदर अनुदान सशर्त असुन यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प -३ दिनांक २५ एप्रिल २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

४. सदर शासन पुरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१२२६१४३२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2025.03.28 00:37:47 +05'30'

(विकास तु.कदम)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.

४) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.

५) सहसंचालक, आरोग्य सेवा,(असंसर्गजन्य रोग ),मुंबई

६) सह संचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.

७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता),मुंबई /नागपूर.

८) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई.

९) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.

१०) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.

१२) निवडनस्ती (आरोग्य-८)